**केंद्रीय गृहमंत्रालयाच्या अधिपत्याखालील राष्ट्रीय न्यायवैद्यक विज्ञान विद्यापिठाचे उपकेंद्र नागपूर येथे स्थापन करण्याकरीता मौजा चिंचोली,ता. कामठी, जि. नागपूर येथील २०.२३ हे. आर. इतकी शासकीय जमीन मंजुरीबाबत....**

**महाराष्ट्र शासन**

**महसूल व वन विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः जमीन-२०२५/प्र.क्र.२६/ज-८**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक

मंत्रालय, मुंबई-४०००३२.

दिनांक : १५ मे, २०२५.

**संदर्भ :-**

१) केंद्रशासनाचे पत्र क्र. २३०११/१२/२०२४-ws-III दि. ३ सप्टेंबर, २०२४

२) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग नागपूर यांचे पत्र क्र. जमीन/कार्या ८ (१)/सीआर-०२/ २०२५/कावि-४९ दि. १० फेब्रुवारी, २०२५

**प्रस्तावना :-**

केंद्रीय गृह मंत्रालयाच्या दिनांक ०३.०९.२०२४ रोजीच्या पत्रान्वये महाराष्ट्र राज्यात राष्ट्रीय न्यायवैद्यक विज्ञान विद्यापीठ, गांधीनगर, गुजरात या केंद्रीय गृह मंत्रालयाच्या अधिनस्त शासकीय संस्थेचे उपकेंद्र महाराष्ट्रामध्ये स्थापन करण्यास तत्वतः मान्यता देण्यात आलेली होती. राष्ट्रीय न्यायवैद्यक विज्ञान विद्यापीठ (National Forensic Science University), गांधीनगर, गुजरात यांनी निश्चित केलेल्या मौजे चिंचोली, ता. कामठी, जि. नागपूर भूमापन क्र. उपविभाग १४० येथील शासकीय जागेस गृह मंत्रालयाच्या दिनांक १०.१२.२०२४ रोजीच्या पत्रान्वये तत्वतः मान्यता दिलेली असून जमीन हस्तांतरणाबाबत तातडीने कार्यवाही करण्याच्या सूचना राज्य शासनाने दिलेल्या आहेत.

तसेच, केंद्रीय गृह मंत्रालय, महिला सुरक्षा प्रभाग यांच्या दिनांक १८.०३.२०२५ रोजीच्या राजपत्रान्वये नागपूर (महाराष्ट्र) येथे स्थापन झालेल्या कॅम्पसमध्ये राष्ट्रीय न्यायवैद्यक विज्ञान विद्यापीठाचे कॅम्पस समाविष्ट असतील असे अधिसूचित केले आहे. राष्ट्रीय न्यायवैद्यक विज्ञान विदयापीठ, गांधीनगर, गुजरात या संस्थेचे उपकेंद्र नागपूर (महाराष्ट्र) येथे सुरु करण्यासंदर्भातील प्रकल्पास गृह मंत्रालयाने मान्यता दिलेली असून सन २०२५-२०२८ या कालावधीकरिता सदर प्रकल्पासाठी रु.१२०.०० कोटी इतके अनुदान राष्ट्रीय न्यायवैद्यक विज्ञान विदयापीठ यांना प्राप्त होणार आहे. सदर प्राप्त होणाऱ्या अनुदानामधून प्रस्तावित उपकेंद्राचे नियोजित बांधकाम पूर्ण केले जाणार आहे. सदर प्रयोजनासाठी किमान ५० एकर जमीन आवश्यक आहे. (Bonafide Area Requirement)

राष्ट्रीय न्यायवैद्यक विज्ञान विदयापीठ, गांधीनगर, गुजरात ही केंद्रीय गृह मंत्रालयाच्या अखत्यारित येणारी शासकीय संस्था आहे. राष्ट्रीय न्यायवैद्यक विज्ञान विदयापीठ (NFSU), गांधीनगर, गुजरात हे विदयापीठ फॉरेन्सिक सायन्सला समर्पित केलेले आंतराष्ट्रीय दर्जाचे एकमेव विदयापीठ आहे. त्याचप्रमाणे राष्ट्रीय न्यायवैद्यक विज्ञान विदयापीठ (NFSU), या विदयापीठाला राष्ट्रीय संस्थेचा (Institution of National Importance INI) दर्जा देण्यात आलेला आहे.

सदर विदयापीठाचे केंद्र महाराष्ट्र राज्यात स्थापन होत असल्याने महाराष्ट्र राज्यासाठी सदर बाब अभिमानास्पद आहे. या केंद्राचा फायदा न्यायसहायक वैज्ञानिक प्रयोगशाळा संचालनालय, मुंबई व अधिपत्याखालील सर्व प्रादेशिक प्रयोगशाळा व लघु प्रयोगशाळांमधील अधिकारी/कर्मचा-यांना होणार आहे. तसेच न्यायाधीश, पोलीस अधिकारी/कर्मचारी, वैदयकीय अधिकारी तसेच सरकारी अभियोक्ता यांना होणार असल्याने पर्यायाने याचा फायदा न्यायदानाला होणार आहे.

सद्यस्थितीत राष्ट्रीय न्यायवैद्यक विज्ञान विदयापीठाचे उपकेंद्र विश्वास सेल, पोलिस हेल्प सेंटर बिल्डिंग, परसोडी, सुभाषनगर, नागपूर येथील इमारतीत तात्पुरत्या स्वरुपात भाडेतत्वावर कार्यान्वित करण्यात येणार आहे. तथापि, मौजे चिंचोली येथील मागणी करण्यात आलेली जागा तातडीने विद्यापीठास हस्तांतरित होणे आवश्यक आहे. जेणेकरुन विद्यापीठाचे उपकेंद्र स्वमालकीच्या जागेत नियमितपणे कार्यरत करणे शक्य होईल. यासंदर्भात केंद्रीय गृह मंत्रालयाने देखील जागा तातडीने हस्तांतरित करणेबाबत राज्य शासनास सूचित केले आहे. त्यास अनुसरुन दिनांक दि.१३/०५/२०२५ रोजीच्या मा. मंत्रीमंडळामध्ये निर्णय घेण्यात आला.

**शासन निर्णय :-**

केंद्रीय गृह मंत्रालयाच्या अखत्यारितील राष्ट्रीय न्यायवैद्यक विज्ञान विद्यापीठ, गांधीनगर, गुजरात या शासकीय संस्थेचे नागपूर, महाराष्ट्र राज्य येथे उपकेंद्र स्थापन करण्याकरिता मौजे चिंचोली, ता. कामठी, जि. नागपूर येथील स.नं. १४० मधील २०.२३ हे. आर. इतकी शासकीय जमीन महाराष्ट्र जमीन महसूल संहिता १९६६ चे कलम २०,३१ व ४० तसेच महाराष्ट्र जमीन महसूल (सरकारी जमीनीची विल्हेवाट लावणे नियम ५ व ६ मधील तरतुदीनुसार) भोगाधिकार मुल्यरहित व महसूलमुक्त किंमतीने कब्जे हक्काने कार्यकारी कुलसचिव, राष्ट्रीय न्यायवैद्यक विज्ञान विद्यापीठ, गांधीनगर गुजरात यांच्या नावे खालील अटी व शर्तींच्या अधिन राहून मंजूर करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**<u>अटी व शर्ती-</u>**

१. सदर जमीन कार्यकारी कुलसचिव, राष्ट्रीय न्यायवैद्यक विज्ञान विद्यापीठ, गांधीनगर गुजरात भोगवटादार वर्ग-२ या धारणाधिकाराने धारण करतील. शासनाच्या, महसूल विभागाच्या पूर्वमान्यतेशिवाय ही जमीन अथवा त्याच्या कोणत्याही भागाची विक्री,

बक्षीसपत्र, गहाण व अन्य कोणत्याही प्रकारे हस्तांतरण करणार नाही. सदर जमिनीवर अथवा त्याच्या कोणत्याही भागावर अन्य व्यक्ती/ संस्था/ कंपनी इत्यादींचे कोणत्याही प्रकारचे हक्क निर्माण होतील अशा प्रकारे कोणताही आर्थिक व्यवहार करणार नाही. तसेच शासनाच्या महसूल विभागाच्या पूर्वमान्यतेशिवाय सदर जमीनीचे पोट विभाजन करता येणार नाही.

२. अर्जदार संस्था विषयांकित शासकीय जमीनीचा वापर केवळ मंजुर प्रयोजनासाठी करेल. अन्य कोणत्याही प्रयोजनासाठी जमीनीचा अथवा त्याच्या कोणत्याही भागाचा, कायमस्वरुपी अथवा तात्पुरता देखील वापर करण्यापूर्वी महसूल विभागामार्फत शासनाची पूर्वमान्यता आवश्यक राहील.

३. सदर जमीनीच्या मंजूर क्षेत्रावरील निस्तार हक्क कमी करण्याची जबाबदारी जिल्हाधिकारी नागपूर यांची राहील.

४. जमिनीचा ताबा मिळाल्यापासुन ३ वर्षांच्या आत मंजूर प्रयोजनासाठी बांधकामास सुरुवात करणे बंधनकारक राहिल.

५. विषयांकित जमिनीवर संबंधित नियोजन प्राधिकरणाच्या विहित परवानगीने व मंजुर विकास नियंत्रण नियमावलीनुसार विकास होणे बंधनकारक राहील. तसेच या व्यतिरिक्त अन्य आवश्यक विभाग / शासकीय यंत्रणा यांची मान्यता / पूर्वपरवानगी / ना- हरकत घेणे देखील बंधनकारक राहील.

६. शासकीय जमीन मंजूरी संदर्भातील इतर नियमित अटी या ठिकाणी लागू राहतील.

७. प्रस्तावित प्रयोजनाच्या व सुरक्षेच्या अनुषंगाने राज्य व केंद्र शासनाच्या विविध विभागांनी वेळोवेळी निर्गमित केलेले आदेश / सूचना अर्जदार संस्थेवर बंधनकारक रहातील व त्यानुषंगाने आवश्यक खबरदारी / काळजी घेणे बंधनकारक राहील.

८. प्रस्तावित प्रयोजनामुळे लगतच्या खातेदारांना कोणत्याही प्रकारचा त्रास होणार नाही, त्यांच्या वैध वहीवाटीस बाधा येणार नाही. तसेच त्यांना पोच रस्ता उपलब्ध असल्याची खबरदारी अर्जदार संस्थेने घ्यावी.

९. वरील अटी - शर्तींपैकी कोणत्याही अटी - शर्तींचा भंग केल्यास शर्तभंगाबाबत सदर शासकीय जमीन शासनजमा करण्याचा अधिकार शासनास राहील.

१०. विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर व जिल्हाधिकारी, नागपूर यांना आवश्यक वाटतील अशा अन्य अटी व शर्ती.

सदर शासन निर्णय दि.१३.०५.२०२५ रोजीच्या मा. मंत्रीमंडळ बैठकीत दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने व वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. २५४/ २०२५/व्यय-९, दि.२२.०४.२०२५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in. या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्याचा संकेतांक क्र. २०२५०५१५१५०३०५४७१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by ASHWINI BHIMRAO YAMGAR
Date: 2025.05.15 15:03:48 +05'30'

**(अश्विनी यमगर)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.
३) मा. उपमुख्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
४) मा. उपमुख्यमंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५) मा. मंत्री (महसूल) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-३२.

६) मा. विरोधी पक्षनेता, विधान परिषद / विधान सभा, मुंबई
७) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई-३२.
८) अपर मुख्य सचिव (महसूल), मंत्रालय, मुंबई-३२.
९) अपर मुख्य सचिव (वित्त विभाग), मंत्रालय, मुंबई-३२.
१०) अपर मुख्य सचिव, गृह  विभाग, मंत्रालय, मुंबई
११) विभागीय आयुक्त, नागपूर विभाग, नागपूर.
१२) जमाबंदी आयुक्त व संचालक, भूमी अभिलेख, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१३) जिल्हाधिकारी, नागपूर.
१४) मा. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य (१), मुंबई -३२.
१५) मा. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र राज्य (२), नागपूर.
१६) कार्यकारी कुलसचिव, राष्ट्रीय न्यायवैद्यक विज्ञान विद्यापीठ, गांधीनगर गुजरात
१७) वित्त विभाग (व्यय-९), मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.
१८) सर्व सह सचिव / उप सचिव, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१९) निवड नस्ती, कार्यासन ज-८, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.